मा.सर्वोच्च न्यायालय आणि मा.उच्च न्यायालयात विशेष समुपदेशी/ वरीष्ठ विधिज्ञ यांची नियुक्ती करण्याबाबतचे धोरण

# महाराष्ट्र शासन
## विधी व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः याचिका-२०१६/प्र.क्र.४२९/२०१६/का.१४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना -**

मा. सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाविरुध्द दाखल करण्यात आलेल्या विविध प्रकरणी राज्य शासनाच्या वतीने काम पाहीलेल्या वरीष्ठ अभियोक्तांच्या प्रलंबित फीबाबत, मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे याचिका क्र.२९६१/२०१४ अन्वये दाखल झालेल्या याचिकेवर, दि. १ ऑक्टोबर, २०१६ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये, राज्य शासनाच्या वतीने न्यायप्रविष्ठ प्रकरणी विशेष समुपदेशींच्या नियुक्तीसंदर्भात धोरण निश्चित करण्याचे आदेश मा. उच्च न्यायालयाने दिले आहेत. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालय आणि मा.उच्च न्यायालयात विशेष समुपदेशी/ वरीष्ठ विधिज्ञ यांची नियुक्ती करण्याबाबतचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र शासनाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालय आणि मा. उच्च न्यायालयात न्यायप्रविष्ट प्रकरणी राज्य शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्यासाठी विशेष समुपदेशी / वरीष्ठ विधिज्ञ यांची नियुक्ती करण्याबाबत “ परीशिष्ट अ ” प्रमाणे मा.सर्वोच्च न्यायालय आणि मा.उच्च न्यायालयात विशेष समुपदेशी/ वरीष्ठ विधिज्ञ यांची नियुक्ती करण्याबाबतचे धोरण या शासन निर्णयाद्वारे विहीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०११०५५१४५११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev Rajaram Keluskar

Digitally signed by Sanjeev Rajaram Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Low And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev Rajaram Keluskar
Date: 2017.02.01 12:22:38 +05'30'

सोबत:- परिशिष्ट अ / Annexure A

**(संजीव केळुसकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक

४. मा.महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य
५. मा.अध्यक्ष, विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मुंबई
६. मा.सभापती, विधान परीषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
८. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा/ रिट सेल/ अपील शाखा) मुंबई
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर / औरंगाबाद
११. मुख्य सचिवांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
१२. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
१३. प्रधान सचिव व विधि परामर्शी विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहाय्यक
१४. सरकारी वकील, उच्च न्यायालय, (मूळ शाखा/ रिट सेल/ अपील शाखा) मुंबई
१५. सरकारी वकील, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर / औरंगाबाद
१६. सर्व अधिकारी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. सर्व मंत्रालयीन विभाग
१८. निवड नस्ती

**मा.सर्वोच्च न्यायालय आणि मा.उच्च न्यायालयात विशेष समुपदेशी/वरिष्ठ विधिज्ञ यांची नियुक्तीबाबत व त्यासंबंधी इतर अनुषंगीकबाबीं संदर्भातील धोरण.**

ज्या अर्थी, फौजदारी प्रक्रिया संहीता, १९७३ च्या कलम २४ (८) मधील तरतूदीनुसार कोणत्याही प्रकरणी किंवा विशिष्ट वर्गवारीतील प्रकरणी, किमान १० वर्षे अनुभव असणाऱ्या विधि व्यवसायीस विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्याचे अधिकार केंद्र किंवा राज्य शासनास आहेत.

ज्याअर्थी, शासन विधि विषयक कामकाज चालविण्याचे नियम, १९८४ च्या भाग तीन मध्ये विशेष समुपदेशी आणि विशेष सरकारी अभियोक्ता यांच्या नियुक्तीच्या कार्यपध्दतीसह नियुक्तीसाठी सक्षम प्राधिकारी, संदर्भ करण्याची कार्यपध्दती,खाजगी व्यक्तीद्वारे करण्यात आलेल्या मागणीनुसार विशेष समुपदेशी आणि विशेष सरकारी अभियोक्ता पदी करावयाची नियुक्ती, त्यासाठी फीचे निकष, प्रवास भत्ता व अन्य खर्चास मान्यता देण्याची विस्तृत कार्यपध्दती विहीत केली आहे.

ज्या अर्थी, अधिवक्ता अधिनियम १९६१ च्या कलम १६ (१) मध्ये वकीलांचे , जेष्ठ वकील आणि अन्य वकील असे वर्गीकरण अभिप्रेत आहे.

ज्या अर्थी, अधिवक्ता अधिनियम १९६१ च्या कलम १६ (२) मधील तरतूदीनूसार मा.सर्वोच्च न्यायालय किंवा मा. उच्च न्यायालयाच्या मते, जर एखाद्या वकीलास त्याची पात्रता, बार मध्ये काम करण्याचा अनुभव, विशेष ज्ञान किंवा एखाद्या कायद्याचा असलेला विशेष अनुभव विचारात घेऊन एखादया वकिलास जेष्ठ वकील म्हणून नामोचित करण्याची तरतूद आहे.

ज्या अर्थी, राज्य शासन, वेळोवेळी, महत्वाच्या न्यायालयीन प्रकरणी जेष्ठ वकील किंवा अन्य वकीलांच्या विशेष समुपदेशी म्हणून सेवा घेते.

ज्या अर्थी, विशेष समुपदेशींच्या फीबाबतच्या मागणीच्या अनुषंगाने उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र.२९६१/२०१४ अन्वये दाखल झालेल्या न्यायालयीन प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने असे निरीक्षण नोंदविले आहे की - न्यायालयीन प्रकरणी जेष्ठ वकीलांना नियुक्त करण्यासंदर्भात कोणत्या प्रकरणी व कोणत्या परीस्थितीत अशा नियुक्त्या कराव्यात, याचे धोरण निश्चित करणे आवश्यक आहे. यासाठी शासनाने, विशेष समुपदेशीची वर्गवारी करुन देय फीचा दर निश्चित करावा, जेणेकरुन प्रलंबित फीचे दावे दाखल होणार नाहीत. धोरणामध्ये अशा स्वरुपाच्या व्यावसायिक फीबाबतच्या तक्रारीच्या निवारणाबाबत व्यवस्थाही अंतर्भूत असेल.

ज्या अर्थी, मा. उच्च न्यायालयाने असेही आदेश दिले की, मा.मुख्य सचिव, प्रधान सचिव व विधि परामर्शी आणि प्रधान सचिव वित्त विभाग यांची बैठक आयोजित करुन याबाबत धोरण निश्चित करुन ते मा. न्यायालयात सादर करावे.

ज्याअर्थी, उपरोक्त आदेशानुसार, मा.मुख्य सचिवांनी उपरोक्त प्रयोजनासाठी दि.२८/१२/२०१६ रोजी अपर मुख्य सचिव (वित्त) व प्रधान सचिव (विधि व न्याय) यांची बैठक घेवून, सर्वंकष चर्चा व विचारविनिमय करुन धोरणाचे प्रारुप तयार केले आहे.

आणि, म्हणून, त्याप्रमाणे विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांच्या नियुक्तीसंबंधी व तद्नुषंगीक बाबींकरीता, खालीलप्रमाणे धोरण तयार केले आहे :-

**१. विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांची नियुक्तीची इष्टता**

१.१ जरी राज्य शासनाची बाजू मा.उच्च न्यायालयामध्ये सरकारी वकील व शासकीय अभियोक्ता व मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये सरकारी वकील मांडत असले तरी प्रकरणाच्या गांभीर्यानुसार ज्यामध्ये सांविधानिक किंवा व्यापक स्वरुपाची कायदेशीर बाब, ज्यामध्ये विधिविधान/नियम याच्या विधि ग्राहयतेस आव्हान देण्यात आले असेल, प्रकरण गुंतागुंतीचे असेल, ज्याच्या निर्णयाचा राज्याच्या धोरणावर व्यापक परीणाम होणार असेल, अशा बाबतीत विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांच्या नियुक्तीची आवश्यकता वादातीत आहे.

१.२ विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांची नियुक्ती केल्यामुळे सरकारी वकील व सरकारी अभियोक्तांच्या सक्षमतेबाबत शंका उपस्थित करण्याचा हेतू नसतो. एक जबाबदार पक्षकार म्हणून व्यापक जनहीत विचारात घेवून न्यायालयीन प्रकरणात दाद मागणे किंवा बचाव करणे व परिणामकारकरित्या व्यापक जनहिताची बाजू मांडण्यास शासन बांधील आहे. तसेच न्यायदान प्रकियेत मा.न्यायालयास आवश्यक सहाय्य देण्यासाठी सुध्दा विशेष समुपदेशीच्या नियुक्त्या कराव्या लागतात.

१.३ त्यामुळे, योग्य प्रकरणी विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्त्याची नियुक्ती करण्याची कार्यपध्दती चालू ठेवणे अत्यावश्यक आहे. तथापि, मा. उच्च न्यायालयाने आदेशित केल्याप्रमाणे उपरोक्त कार्यपध्दती ही सुलभ करणे, विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता

यांची नियुक्ती करण्याचे निकष व मार्गदर्शक तत्वे विहीत करणे व संबंधीत अधिकाऱ्यांना त्यासंबंधी मार्गदर्शनपर सुचना निर्गमित करणे आवश्यक आहे.

**२. विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांची नियुक्ती करण्यायोग्य न्यायालयीन प्रकरणे.**

२.१ फौजदारी प्रक्रीया संहीता, १९७३ च्या कलम २४ (८) मधील तरतुदी आणि शासन विधि विषयक कामकाज चालविण्याचे नियम, १९८४ च्या भाग तीन मधील तरतुदींना बाधा न येता खालील निकषांच्या आधारे प्रकरणपरत्वे विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांची नियुक्ती करता येईल.

**अ)** खालीलपैकी एक किंवा अनेक बाबी/प्रश्न अंतर्भूत असलेली न्यायालयीन प्रकरणे:-

(१) कोणताही शासन निर्णय किंवा कायदा, नियम वा नियमावलीची विधिग्राहयता आव्हानित केली असेल,

(२) व्यापक जनहीताचा समावेश असलेला कायदेशीर प्रश्न, ज्याचा अनेक प्रकरणावर/व्यवहारावर व्यापक परिणाम होण्याची किंवा पूर्वी निकाली निघालेली प्रकरणे/व्यवहार पुनरुज्जीवित होण्याची शक्यता आहे.

(३) शासनाच्या कोणत्याही कार्यकारी निदेश ज्यामुळे शासनाच्या कामकाजावर विशिष्ट प्रकरणाच्या अनुषंगाने दूरगामी परिणाम होणार आहेत, नागरीक बाधित होणार आहेत, व्यापक क्षेत्र बाधित होणार आहेत.

(४) शासनाचा महत्वाचा धोरणात्मक निर्णय.

(५) सेवा विषयक बाबी ज्यामध्ये व्यापक प्रमाणावर राज्याचे कर्मचारी/अधिकाऱ्यांचा समावेश आहे.

(६) प्रकरणे, ज्यामध्ये व्यापक जनहीत सामावलेले आहे किंवा ज्यामुळे मोठया प्रमाणावर जनमानसावर किंवा समाजघटकावर परिणाम होणार आहे.

(७) राज्यातील घटनात्मक प्राधिकाऱ्याकडून घेण्यात आलेला निर्णय किंवा कृती यांच्या ग्राहयतेस/वैधतेस /योग्यतेस आव्हानित केलेली प्रकरणे.

ब) ज्यामध्ये राज्य शासनाची मोठया प्रमाणावर महसूली वसूलीची बाब अंतर्भूत असेल किंवा राज्यावर मोठया प्रमाणावर आर्थिक दायित्व येणार असेल किंवा ज्यामध्ये रु. १ कोटी किंवा त्यापेक्षा जास्त रकमेचा आर्थिक परिणाम असेल अशी प्रकरणे.

क) इतर असे न्यायालयीन प्रकरण ज्यामध्ये विशिष्ट स्वरुप किंवा विशिष्ट परीस्थिती पाहाता संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुख किंवा विधि परामर्शी यांचे असे मत आहे की न्यायालयासमोर त्या प्रकरणी विशेष समुदपदेशींमार्फत प्रभावीपणे शासनाची बाजू मांडणे आवश्यक आहे.

**३. विशेष समुपदेशी किंवा विशेष सरकारी अभियोक्ता यांची निवड करतांना विचारात घ्यावयाच्या बाबी**

३.१ न्यायालयीन प्रकरणी विशेष समुपदंशींची नियुक्ती करतेवेळी विधि अधिकाऱ्यांना म्हणजेच मा.सर्वोच्च न्यायालयात, ॲटर्नी जनरल ऑफ इंडीया, सॉलीसिटर जनरल किंवा ॲडीशनल सॉलीसिटर जनरल, व मा.उच्च न्यायालयात महाअधिवक्ता किंवा सहयोगी महाअधिवक्ता यांना प्राधान्य देण्यात यावे.

३.२ कोणताही शासन निर्णय किंवा कायदा, नियम वा नियमावलीची विधिग्राहयता आव्हानित केली असेल त्यावेळी उपरोक्त विधि अधिकाऱ्यांना विशेषत्वाने प्राधान्य द्यावे.

३.३ शक्यतो, विधि व न्याय विभागाने नियुक्त केलेल्या विशेष समुपदेशींच्या पॅनेलवरील विधिज्ञांच्या सेवा घेण्यात याव्यात.

३.४ शक्यतो, मा.सर्वोच्च न्यायालय तसेच मा. उच्च न्यायालयाने नामोचित केलेल्या ज्येष्ठ विधिज्ञांची विशेष समुपदेशी म्हणून नियुक्ती करण्यात यावी.

३.५ विधि अधिकारी म्हणून नियुक्ती केले नसलेल्या किंवा जेष्ठ वकील म्हणून नामोचित नसलेल्या वकीलास विशेष समुपदेशी म्हणून नियुक्ती देण्याचे प्रस्तावित असल्यास त्या विधिज्ञाचे विशिष्ट क्षेत्रातील ज्ञान किंवा प्राविण्य सर्वश्रृत व निर्विवाद असावे.

३.६ विशेष समुपदेशीची नियुक्ती वस्तुनिष्ठतेच्या आधारावर करण्यात यावी. तसेच त्यांच्या नियुक्तीच्या निर्णयावर इतर घटकांचा अथवा पक्षपातीपणाचा प्रभाव नसावा.

३.७ विशेष समुपदेशीची नियुक्ती करतांना, शासनाच्या हितास बाधा पोहचणार नाही याची काळजी घेण्यात यावी. जसे की, त्या वकीलांनी प्रतिवादीच्या वतीने काम केलेले नसावे किंवा विशिष्ट परिस्थितीमुळे संबंधीत वकिल राज्याची बाजू प्रभावीपणे पूर्ण क्षमतेने मांडू शकणार नाहीत अशा वकिलांची नियुक्ती करण्यात येऊ नये.

**४. व्यावसायिक शुल्क (फी)**

४.१ वकीलास देण्यात येणारी फी ची रक्कम ही, व्यवसायिक सेवेचे स्वरुप लक्षात घेता, सर्व प्रकरणी समान असू शकत नाही. तसेच वकिली व्यवसायातील अनुभव, व्यवसायातील निपुणता, व्यवसायिक सेवेचे स्वरुप यांचा सर्वंकष विचार न करता फीचे आधारभूत परिमाण निश्चित करणे योग्य होणार नाही.

४.२ मा. उच्च न्यायालयाने केलेल्या निरिक्षणानुसार राज्य शासन खाजगी दावेदारांच्या आर्थिक क्षमता व अन्य शक्ती यांची बरोबरी करु शकत नाही व त्यामुळे वरिष्ठ विधिज्ञ मागतील ती फी देऊ शकणार नाही.

४.३ त्याचवेळी शासन नियुक्त करीत असलेल्या पॅनेलवरील विशेष समुपदेशींची फी किंवा जेष्ठ वकीलांची फी इतकीही अल्प असू नये की, ज्यामुळे कार्यक्षम व प्रतिभावंत समुपदेशी राज्याची नियुक्ती स्वीकारण्यास अनुत्सुक असतील.

४.४ विशेष समुपदेशींसाठी निश्चित केलेली फी त्यांची कार्यक्षमता, प्रतिभा व प्रतिष्ठा यांचा आदर ठेवणारी व ते देत असलेल्या व्यवसायिक सेवेचा सन्मान राखणारी असावी.

४.५ त्यामुळे फीचे दर हे वास्तवदर्शी असावेत व त्यामध्ये ठराविक कालांतराने सुधारणा करुन ते कालानुरुप वास्तवदर्शी असावेत.

**५. नियुक्तीच्या अटी**

५.१ फी बाबत वाद किंवा न्यायालयीन प्रकरणे टाळण्यासाठी विशेष समुपदेशींची नियुक्ती करतांना त्यांच्या फीचे दर नियुक्तीच्या अटी-शर्तीसह निश्चित करण्यात यावेत. त्यांच्या नियुक्ती आदेशामध्ये विशिष्ट प्रकरणी द्यावयाची फी ही शासनाच्या विधि व न्याय विभागाने ठरविलेल्या फीच्या दराने असेल किंवा त्या वकीलांनी

केलेल्या मागणीनुसार असेल हे स्पष्टपणे नमूद करावे. वकिलांच्या मागणीप्रमाणे फी देणेची असल्यास नियुक्ती आदेश निर्गमित करण्यापूर्वी संबंधीत वकिलांशी चर्चा करुन फीची रक्कम निश्चित करण्यात यावी.

५.२ जर प्रस्तावित नियुक्ती ही शासनाच्या विधि व न्याय विभागाने निश्चित केलेल्या दराने करावयाची असेल, तर त्या प्रकरणी विधि व न्याय विभागाचा विमर्श घेण्याची आवश्यकता नाही. ज्या प्रकरणी फी पोटी देय रक्कम संबंधित प्रशासकीय विभागाकडून प्रदान करण्यात येणार असेल आणि त्या फीच्या दराशी संबंधित प्रशासकीय विभाग सहमत असेल अशा प्रकरणी देखील फी निश्चितीसाठी विधि व न्याय विभागाकडे संदर्भ करण्याची आवश्यकता नाही. फक्त ज्या प्रकरणी वकीलांनी मागणी केलेली फी ही योग्य आहे काय, याची संबंधित विभागास खात्री करावयाची असेल अशा प्रकरणी नियुक्ती आदेश निर्गमित करण्यापूर्वी विधि व न्याय विभागाचा सल्ला घेण्यात यावा. त्यामुळे फी संदर्भात वाद किंवा न्यायालयीन प्रकरणे उद्भवणार नाहीत.

५.३ जे वकील, प्रकरण जेथे न्यायप्रविष्ट आहे त्या न्यायालयात (सर्वोच्च न्यायालय किंवा उच्च न्यायालय) सर्वसाधारणपणे नियमित वकीली करीत नसतील, अशा वकीलास विशेष समुपदेशी म्हणून नियुक्ती देतांना त्यांच्या प्रवास व अन्य अनुषंगिक खर्चाबाबत नियुक्ती आदेश निर्गमित करण्यापूर्वी निश्चिती करावी.

**६. फीचे त्वरेने प्रदान**

६.१ विशेष समुपदेशींनी फीची देयके योग्य प्रकारे सादर केल्यावर त्याचे वेळेवर प्रदान करणे हे राज्य शासन व संबंधित वकील यांची परस्पर विश्वासार्हता कायम राखण्यासाठी आवश्यक आहे.

६.२ सर्वसाधारणपणे विशेष समुपदेशींनी फीची देयके योग्य प्रकारे सादर केल्यावर आर्थिक तरतूद उपलब्धतेच्या अधीन राहून ३० ते ६० दिवसात प्रदान करण्यात यावीत.

६.३ संबंधित प्रशासकीय विभागाने **"व्यावसायिक सेवा"** या लेखाशिर्षाखाली विशेष समुपदेशींची फी देण्याकरिता पुरेशी तरतूद करावी.

६.४ संबंधित प्रशासकीय विभाग विशेष समुपदेशींच्या नियुक्तीसंदर्भात प्रलंबित देयकाची प्रदाने करण्यासाठी सौदार्हपूर्ण दृष्टिकोन ठेवेल, जेणे करुन विवाद टाळता येतील.

**७. तक्रार निवारण यंत्रणा**

७.१ संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुख हे ६० दिवसांपेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित राहीलेल्या व्यवसायिक फीच्या मागणीच्या प्रकरणांचा द्वैमासिक आढावा घेतील.

७.२ संबंधित विधि व्यवसायीने ६० दिवसांपेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित राहीलेल्या व्यावसायिक फीच्या देयकाबाबतची बाब प्रथमत: संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुखाच्या निदर्शनास आणावी. जर त्यानंतरही ९० दिवसांपेक्षा जास्त कालावधीपर्यंत देयकाचे प्रदान झाले नाही, तर त्याने ही बाब प्रधान सचिव व विधि परामर्शी यांच्या निदर्शनास आणावी, जेणेकरुन त्यांचे मार्फत तक्रारीचे निवारण करण्याच्या दृष्टिने योग्य पाऊले उचलली जातील.

७.३ प्रधान सचिव व विधि परामर्शी यांनी प्रलंबित व्यावसायिक फीच्या तक्रारीच्या निवारणाच्याअनुषंगाने दिलेला सल्ला/विमर्श हा संबंधितावर बंधनकारक असेल.

**८. सरकारी वकील/शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय किंवा सरकारी वकील सर्वोच्च न्यायालय यांचेमार्फत विशेष समुपदेशीची नियुक्ती**

८.१ सरकारी वकील/शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय किंवा सरकारी वकील सर्वोच्च न्यायालय यांनी संबंधित प्रशासकीय विभाग किंवा प्रधान सचिव व विधि परामर्शी यांची पूर्व मंजूरी न घेता परस्पर विशेष समुपदेशीच्या नियुक्ती केल्यामुळे फीच्या प्रदानाबाबत वाद उद्भवतात. त्यामुळे सरकारी वकील/शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय किंवा सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय यांच्याकडून परस्पर विशेष समुपदेशींच्या नियुक्त्या करण्यात येऊ नयेत.

८.२ अपवादात्मक व अत्यंत तातडीच्या प्रसंगी जेव्हा सरकारी वकील/शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय किंवा सरकारी वकील सर्वोच्च न्यायालय यांना संबंधित प्रशासकीय विभाग किंवा प्रधान सचिव व विधि परामर्शी यांची पूर्व मंजूरी घेणे शक्य नसेल तेव्हा त्यांनी तातडीने व उशीरात उशीरा लगतच्या शासकीय कामकाजाच्या दिवसाअखेरपर्यंत संबंधित प्रशासकीय विभाग/प्रधान सचिव व विधि परामर्शी यांची कार्योत्तर मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

**९. प्रशासकीय प्रमुखांना विशेष समुपदेशींच्या नियुक्तीच्या अधिकाराचे प्रदान करणे**

९.१ नियम १८(१) मधील तरतूदीनुसार विधि परामर्शीच्या मान्यतेशिवाय विशेष समुपदेशी नियुक्त करता येत नाहीत. तथापि, वेळेची बचत होण्यासाठी तसेच धारीकांचा अनावश्यक प्रवास टाळण्यासाठी सुयोग्य प्रकरणी विशेष समुपदेशींच्या नियुक्तीचे प्राधिकार संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान करण्याच्या दृष्टिने सदर नियमात सुधारणा करणे योग्य होईल.

९.२ अशा प्रकारे विशेष समुपदेशीच्या नियुक्तीचे प्राधिकार संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान करतांना शासन विधि विषयक कामकाज चालविण्याचे नियम, १९८४ मध्ये सुधारणा करुन किंवा शासन निर्णयाद्वारे निकष ठरविण्यात यावेत ज्यामध्ये, ज्या प्रकरणी असे नियुक्तीचे अधिकार प्रदान करावयाचे आहेत त्या प्रकरणांची वर्गवारी, ज्या विशेष समुपदेशींचे नियुक्तीचे अधिकार प्रदान करावयाचे आहेत त्या विशेष समुपदेशींची वर्गवारी व नियुक्तींच्या अटी व शर्ती यांचा समावेश असेल.

१०. **व्यावृत्ती:**

१०.१ उपनिर्दिष्ट तरतूदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरीही, मुख्यमंत्री किंवा विधि व न्याय विभागाचे प्रभारी मंत्री यांना एखादया न्यायालय किंवा न्यायाधिकरणासमोरील प्रकरणामध्ये, त्याला आवश्यक वाटल्यास विशेष समुपदेशी नियुक्त करण्याच्या अधिकारास बाधा येणार नाही.

## Policy regarding appointment of Special or Senior counsel in the Hon'ble Supreme Court and Hon'ble High Court and the matters connected therewith or incidental thereto

Whereas Section २४ (८) of the Code of Criminal Procedure १९७३ empowers the Central or the State Government to appoint, for the purposes of any case or class of cases, a person who has been in practice as an advocate for not less than १० years as a Special Public Prosecutor.

Whereas Chapter III of the Rules for the Conduct of the Legal Affairs of Government, १९८४ contains elaborate provisions regarding the procedure for appointment of the Special Counsel and Special Public Prosecutors, including the authority competent to appoint, the procedure of making the references, the engagement of special Counsel or Special Public Prosecutors on the request of private parties and the terms of engagement including the fees, travelling allowances and other charges.

Whereas Section १६(१) of the Advocates Act १९६१ recognizes the classification of the advocates into Senior Advocates and other Advocates.

Whereas Section १६ (२) of the Advocates Act provides that the Hon'ble Supreme Court or the Hon'ble High Court may designate an advocate as a Senior Advocate, if the Hon'ble Supreme Court or Hon'ble High Court is of the opinion that by virtue of ability, standing at the Bar or special knowledge or experience in law a particular advocate deserves such a distinction.

Whereas the State Government often avails the services of designated Senior Counsels or other Advocates as Special Counsel to represent the State Government in important matters.

Whereas the Hon'ble Bombay High Court in Writ Petition No.२९६१/२०१४ (arising out of a claim by the Special Counsel for payment of fees), inter-alia, observed that there ought to be a clear and definite policy for representation of the State by the Special Counsel; the policy shall spell out as to when and in what cases the Senior Advocate should be engaged as a Special Counsel; the desirability of pre-determined scales of fees and the expeditious payment of fees so as to obviate litigation for recovery of such fees; it shall provide

a mechanism to redress all grievances in relation to professional fees of the Special Counsel engaged by the State.

Whereas the Hon◦ble Court had further directed that a meeting of the Chief Secretary, the Principal Secretary (Law and Judiciary Department) and the Principal Secretary (Finance Department) be convened and thereafter the State shall place the policy before the Hon'ble Court.

Whereas, as directed, the Chief Secretary, Additional Chief Secretary (Finance Department) and Principal Secretary (Law and Judiciary Department) held a meeting on २८.१२.२०१६ and deliberated upon the issues and formulated a draft policy.

Now, therefore, the following policy is framed for appointment of Special Counsel or Special Public Prosecutor and the matters connected thereto and incidental therewith, as under:

**१. Desirability of appointment of Special Counsel/Senior Counsel and Special Public Prosecutor.**

१.१ Though the State Government is represented by the Government Pleaders or the Public Prosecutors before the Hon'ble High Court and the Government Advocate before the Hon'ble Supreme Court the necessity of appointment of a Special Counsel or a Special Public Prosecutor having regard to the nature of the case, the constitutional or legal issues of general importance, the challenge to the constitutionality of the legislation/rules, the complexity of the matter, the wide ramifications of the outcome of the litigation on the State Policy, cannot be over emphasized.

१.२ The appointment of the Special Counsel may not necessarily reflect upon the competence of the Government Pleader or Public Prosecutor as the State as a responsible litigant is enjoined to prosecute or defend the larger public interest or cause of the people in an efficient manner and also render the necessary assistance to the Hon◦ble Courts in the adjudication of the matters.

१.३ The system of appointment of Special Counsel or Special Public Prosecutor, in deserving cases, therefore, needs to be continued. However the procedure needs to be streamlined and, as directed by the Hon'ble Court, the parameters for appointment of Special Counsel are required to be clearly defined and adequate guidance is provided to the concerned officers in exercising the discretion to appoint a Special Counsel or Special Public Prosecutor.

२. Cases in which Special Counsel may be appointed.

२.१ Without derogating from the generality of power under Section २४(८) of Code of Criminal Procedure १९७३ and Chapter III of the Rules for the Conduct of the Legal Affairs of Government, १९८४ the following can be the parameters on the basis of which the Special Counsels may be appointed:

A) The case involves one or more of the following issues/factors

i) Constitutionality of any Act, Rules, Regulations or Government Resolution.

ii) A question of law of general public importance, which has the potential to affect large cases/transactions or reopen settled cases/transactions.

iii) Legality of any executive instruction which has wide ramifications over the functioning of the Government either in relation to the subject matter, citizens affected or area covered.

iv) A major policy decision of the Government.

v) Service matters involving large number of employees/officers of the State.

vi) Matters which involve larger public interest or which may have impact upon a huge population or segment of the society.

vii) Matters involving the challenge to the legality, propriety and correctness of any action or decision of a constitutional functionary within the State.

B) The case involves legal question which affects the recovery of huge revenue of the State Government or creates huge financial obligations upon the State Government or otherwise the financial implications are in excess of Rs.१ Crore.

C) Any other matter which, in the opinion of the Head of the Department or the Remembrancer of Legal Affairs, having regard to its peculiar nature or special circumstances is required to be effectively presented before the Hon'ble Court through the assistance of the Special Counsel.

**३. Factors to be taken into consideration while choosing the Special Counsels.**

३.१ While engaging the Special Counsel, preference be given to the Law Officers namely the Attorney General for India, Solicitor General or Additional Solicitor General, in the Hon'ble Supreme Court, and Advocate General or Associate Advocate General in the High Court.

३.२ Law Officers should be given preference especially in the matters where the constitutionality of the Acts/Rules/Regulations or the Government Resolutions is challenged.

३.३ As far as possible, the Panel Advocates, empanelled by the State Government in Law and Judiciary Department, be appointed as Special Counsels.

३.४ As far as possible designated Senior Advocates may be appointed as Special Counsel as the Hon◦ble Supreme Court or High Court confers such distinction upon those Advocates.

३.५ Whenever an Advocate who is neither a Law Officer nor a designated Senior Counsel is proposed to be appointed as a Special Counsel, the expertise or special knowledge of such an Advocate in the particular field of law should be proven and unquestionable.

३.६ The appointment of the Special Counsel should be made on objective basis and the elements of patronage or favor may not influence the decision.

३.७ While appointing the Special Counsel care should be taken to ensure that there is no conflict of interest, in the sense that the Special Counsel has appeared for the opponent or there are circumstances which compromise his ability to pursue the cause of the State with full force.

४. Fees.

४.१ The fees to be paid to an Advocate for the professional services rendered, from its very nature, cannot be uniform. Nor a standard scale bereft of the standing at the Bar, level of professional expertise, the nature of the services rendered, can be fixed.

४.२ The State Government, as observed by the Hon◦ble Court, cannot match the financial strength and power of a private litigant and thus pay the fees as may be commanded by a Senior Advocate.

४.३ At the same time, the fees which the State Government pays to the empanelled Special Counsels or other Senior Advocates should not be abysmally low, so as to discourage competent and accomplished Counsels from taking the State brief.

४.४ The fees must reflect the respect for the ability, stature and standing of the Special Counsel and represent a dignified remuneration for the services rendered.

४.५ The scale of fees, therefore, should be fixed in a realistic manner and it should be periodically revised to make it relevant.

५. Terms of Engagement.

५.१ While appointing a Special Counsel care should be taken to specifically mention the terms of engagement including the remuneration to be paid so as to avoid any dispute or litigation regarding the payment of fees. It should be clearly mentioned whether the appointment is on the term of payment of fees as per the scale pre-determined by the Government in the Law and Judiciary Department or the fees claimed by the Special Counsel (which may be negotiated, before the appointment).

५.२ If the appointment is on the term of payment of fees as per the prevailing scale pre-determined by the Government, in Law and Judiciary Department, then there is no need to again refer the matter to the Law and Judiciary Department for concurrence for payment of fees. Even when the term of engagement is payment of fees as commanded by the Special Counsel, if the department is agreeable to the said term, reference to Law and Judiciary Department may not be made in the matter of payment of fees. Only when the department wants a view on the reasonability of the fees before engagement of a Special Counsel, a reference may be made to the Law and Judiciary Department. This procedure may prevent avoidable disputes and litigations.

५.३ In case of appointment of an Advocate to represent the State before the High Court or the Supreme Court, where the said Advocate does not ordinarily practice, the aspects of travelling expenses and other charges be also cleared before the appointment.

**६. Expeditious payment of fees.**

६.१ The timely payment of fees after the bills are properly lodged by Special Counsels is crucial to maintain the trust between the State and the Special Counsel.

६.२ Ordinarily, a bill lodged by the Special Counsel, subject to availability of the budgetary provision be cleared within ३०-६० days.

६.३ The administrative departments shall make adequate provision in their budget under the head of professional services to meet the bills raised by the Special Counsels.

६.४ The concerned departments shall make an endeavor to treat the request for clearance of the pending bills in a courteous and friendly manner and avoid confrontation.

**७. Grievance redressal mechanism.**

७.१ The Head of the Department may take a bi-monthly review of the cases in which the bills for professional fees of the Special Counsels are pending beyond the period of ६० days.

७.२ The concerned Advocates may, in the first instance, bring the fact of pendency of bill beyond the period of ६० days to the notice of Head of the Department. If this bill still remains pending for more than ९० days, then the said fact may be brought to notice of the Remembrancer of Legal Affairs, who shall thereupon take appropriate measures to settle the grievance.

७.३ The redressal of the grievance suggested by the Remembrancer of Legal Affairs shall be ordinarily binding upon the concerned.

**८. Appointment of Special Counsels by Government Pleader/Public Prosecutor, High Court, or Government Advocate Supreme Court.**

८.१ The appointment of a Special Counsel by the Government Pleader/Public Prosecutor in the High Court or Government Advocate in the Supreme Court directly, without reference to the Law and Judiciary Department or concurrence of the concerned administrative department, leads to potential conflicts in the matter of payment of fees subsequently. It is therefore necessary that the Special Counsels are not directly appointed by the Government Pleader/Government Advocate.

८.२ In case of urgency, where it is not possible to obtain the concurrence of either the Law and Judiciary Department or the concerned administrative department, the Government Pleader/Government Advocate must seek ex-post facto approval at the earliest opportunity and in any event not later than the next working day.

**९. Delegation of powers to the Administrative Head to appoint the Special Counsel.**

९.१ As per the extent rule १८(१), Special Counsel cannot be appointed without the sanction of Remembrancer of Legal Affairs. In order to save the time and avoid unnecessary movement of files, in deserving cases, this stipulation needs to be suitably modified with a view to confer power upon the Heads of the Administrative Departments to appoint the Special Counsels.

९.२ While conferring the powers upon the Heads of the Administrative Departments the parameters in which the said powers may be exercised, in relation to the matters in which such appointments may be made, the profile of the Special Counsel to be

appointed and the terms of the professional engagement may be delineated by appropriate Government Resolution or suitable amendment in the Rules for the Conduct of the Legal Affairs of Government, १९८४.

१०. **Savings.**

१०.१ Nothing contained hereinabove shall derogate from the authority of the Chief Minister or the Minister in-charge of the Law and Judiciary Department to appoint an advocate as a Special Counsel in any matter before any Court or Tribunal, which he deems appropriate.